# हिमवादळात सापडली शाळकरी मुले

लेखक : **मार्टी ऱ्होड्स फिगली**

चित्रे व सजावट: **शेली ओ. हास**

अनुवाद: **सुजाता गोडबोले**

# हिमवादळात सापडली शाळकरी मुले




लेखक : **मार्टी ऱ्होड्स फिगली**

चित्रे व सजावट: **शेली ओ. हास**

अनुवाद: **सुजाता गोडबोले**

## मध्य नेब्रास्का

## १२ जानेवारी १८८८

साराच्या मनात विचार आला,

कधीकधी लहान बहिणी म्हणजे कटकटच असतात.

आज सकाळचेच पहा ना.

सारा आणि तिची बहीण

शाळेच्या अर्ध्या रस्त्यापर्यंत पोचल्या होत्या.

आणि ॲनी म्हणाली,

“माझा डबा घरीच विसरला आहे.”

“माझा डबा आपण दोघी मिळून खाऊया,”

साराने सुचवले.

“नको. मला माझाच डबा हवा आहे.

त्यात काहीतरी खास आहे,” ॲनी म्हणाली.

काल ॲनीचा सातवा वाढदिवस झाला होता.

आज सकाळी आईने त्यांच्या डब्यात

अंड्याचे सँडविच आणि

शिल्लक राहिलेली वाढदिवसाची केक दिली होती.

आई नेहमी त्यांच्या डब्यात गोड काहीतरी असावे म्हणून

उकडलेला खजूर देत असे.

“आता जर आपण परत गेलो, तर आपल्याला

शाळेत पोचायला उशीर होईल,” सारा म्हणाली.

“आपल्या बाईंना उगीच नाराज करायला नको.

मिस फ्रीमनना उशीरा आलेले मुळीच आवडत नाही.”

“ते काही नाही!” ॲनी म्हणाली.

“मला माझी केक हवी आहे.”





सारा आणि ॲनी धावत घरी निघाल्या

तेव्हा त्यांचे चौकटीचे स्कर्ट

जोरजोरात फडफडत होते.

नेब्रास्का मधील सपाट कुरणातून त्यांना

एक मैलाहून अधिक अंतर पार करायचे होते.

“निदान तू डबा विसरलीस,

तो दिवस तरी चांगला आहे,” सारा म्हणाली.

“जानेवारी महिन्यात इतके गरम

कधीच होत नाही.”





त्या शेतावर पोहोचल्या,

तेव्हा आई बाहेर कपडे वाळत घालत होती.

ती हसत म्हणाली, “मला वाटलेच होते

की तुम्ही केक घेऊन जायला परत  याल!”

तिने ॲनीच्या हातात डबा दिला

आणि लवकर निघायला सांगितले.

“आता पळा.

शाळेला उशीर करू नका.”



मुली पळत पळत शाळेत गेल्या.

आणि शाळा सुरु होणार, इतक्यातच पोहोचल्या.

त्यांच्या शिक्षिका मिस मिनी फ्रीमन

दारात उभ्या होत्या.

त्या शाळेची घंटा वाजवत होत्या.

त्यांनी  दोघींना खुणेनेच आत जायला सांगितले.

त्या म्हणाल्या, “तुम्ही येता की नाही

याचा मी विचारच करत होते.”

आपला डबा कसा घरी विसरला होता

ते ॲनीने त्यांना सांगितले.

“असं होय! या, आता वर्गात चला,”

त्या हसून म्हणाल्या.

साराला वाटले, मिस फ्रीमन

किती छान आहेत.

शिवाय त्यांना किती तरी माहिती आहे.

त्यांना कुठल्याही शब्दाचे स्पेलिंग येते.

आणि  दहा आकड्यांची बेरीज देखील मनातल्या मनात करता येते.

आपण जर मनापासून अभ्यास केला,

तर कदाचित आपल्याला देखील शिक्षिका होता येईल.

मग आपण देखील आपल्या लांब केसांचा

त्यांच्यासारखा अंबाडा बांधू .

शिक्षिका झाल्यावर आपण मधुर आवाजात बोलू.

आणि मिस फ्रीमन प्रमाणेच

नेहमी वेळेवर शाळेत येऊ.





शाळेच्या आतील भिंती आणि जमीन

माती सारखी दिसत होती.

पण साराला मात्र ही खोली छान उबदार

आणि आनंदी वाटत असे.

मिस फ्रीमननी  खिडक्यांना

पडदे लावले होते.

कोळशावर चालणाऱ्या शेकोटी समोर

चिंध्या विणून बनवलेली एक सतरंजी

जमिनीवर अंथरलेली होती.

मिडवेल मधील ही एका खोलीची शाळा होती.

या सपाट कुरणात फार थोडी झाडे होती.

म्हणून शाळेच्या बांधकामात लाकडाचा वापर केलेला नव्हता.

त्याऐवजी माती आणि गवताचे चौकोनी ठोकळे

एकावर एक रचून

भिंती केल्या होत्या.

गवताळ जमिनीतील गवत कापून हे ठोकळे बनवले होते.

गवताची दाट  मुळे माती पकडून ठेवत असत.





मिडवेलच्या या शाळेत एकूण सोळा मुले होती.

सर्वात लहान रॅचेल,

फक्त सहा वर्षांची होती.

सर्वात मोठी मुले, जेक आणि सेठ पंधरा वर्षांची होती.

सारा यांच्या मधली

म्हणजे नऊ वर्षांची होती.

त्या दिवशी सकाळी मुले

निरनिराळ्या प्रांतांची नावे शिकली.

मग त्यांनी वाचनाचा

आणि स्पेलिंगचा अभ्यास केला.

शिवाय त्यांनी पाटीवर लिहिण्याचाही

सराव केला.

जेवणाच्या सुट्टीत मिस फ्रीमन म्हणाल्या,

“आज तर वसंत ऋतू सारखी हवा आहे.

आपण बाहेर बसून जेवूया.”

नेहमीप्रमाणेच ॲनीच्या खोड्या सुरु झाल्या.

तिने साराच्या डब्यातला केक खाण्याचा प्रयत्न केला.

“तुला मिळणार नाही हं,” साराने बजावले.

“पण वाढदिवस तर माझा होता, तुझा नाही,”

ॲनी चिडून म्हणाली.

ती पुढे म्हणाली,

“घरी गेल्यावर जर केक उरली असेल,

तर ती सगळी मी खाणार आहे.”

“ते घरी गेल्यावर पाहू,” साराने उत्तर दिले.





सुट्टीत सगळी मुले

गोल करून खेळत होती

सारा देखील त्यांच्याबरोबर खेळू लागली.

ॲनी म्हणाली, “मला पण खेळायचे आहे.”

पण तिच्यावर डाव आला तेव्हा

“आईचे पत्र हरवले,”

म्हणायच्या ऐवजी ती परत परत

“आईचे पत्र, आईचे पत्र,” एवढेच म्हणू लागली.

मग काही मुली हसू लागल्या.

“तू नीट खेळत नाहीस,” साराने तिला समजावले.

ॲनी ते ऐकून रडवेली झाली.

“मी लहान आहे म्हणून

तुम्हाला माझ्याशी खेळायचे नाही आहे,”

ती रुसून म्हणाली.

“तसं काही नाही,” सारा म्हणाली.

“पण तुला खेळायचे असेल, तर सर्वांसारखेच खेळावे लागेल.”

ॲनीने त्यांच्याकडे पाठ फिरवली

आणि ती दूरवर पाहू लागली.

अचानक तिने साराचा दंड पकडला.

ॲनी पाहत होती त्याच दिशेने साराही पाहू लागली.

एखाद्या घाबरलेल्या सशासारखी

तिची छाती धडधडू लागली.

आकाश काही निराळेच दिसत होते.

ढग जणू जमिनीवर उतरले आहेत

असे वाटत  होते.

मैदानावरून ते झपाट्याने

शाळेकडे येत होते.

त्यांचा वेगही खूप होता.

जोरात जाणाऱ्या आगगाडी सारखा आवाज करत

गार  वारे वाहू लागले.







सगळी मुले शेकोटीजवळ येऊन बसली.

खोली आता खूप गार होऊ लागली होती.

सारा थंडीने कुडकुडू लागली.

सगळेच घाबरलेले दिसत होते,

जेक आणि सेठ देखील घाबरले होते.

यापूर्वी साराने त्यांना

कधीच घाबरलेले पाहिले नव्हते.

“लवकर आत चला,” सारा ओरडून म्हणाली.

तिने ऍनीला ओढतच वर्गात नेले.

मिस फ्रीमन सगळी शक्ती एकवटून

जोरजोरात शाळेची घंटा वाजवत होत्या.

“मुलांनो, लवकर आत पळा.”

सगळी मुले आत आली आहेत असे पाहून,

मिस फ्रीमननी दार बंद केले

आणि कडी लावून घेतली.



“शेकोटी पेटती ठेवायला

आपल्याकडे भरपूर कोळसा आहे.”

मिस फ्रीमन म्हणाल्या.

“वादळ संपेपर्यंत

काळजी करायचे काहीच कारण नाही.”

साराने आपले बर्फासारखे गार हात एकमेकांवर चोळले.

बाई म्हणतात ते खरेच असणार.

लांडग्यांचा कळप ओरडत असल्यासारखा

वाऱ्याचा आवाज येत होता.

आता खिडक्याही धडधडू लागल्या होत्या.

**“धडाम”**

दार एकदम जोरात उघडले.

वाऱ्याबरोबर आता बर्फही वर्गात येऊ लागला होता.

मिस फ्रीमननी दार बंद करण्याचा

प्रयत्न केला.

पण वाऱ्यामुळे दाराची बिजागिरी

तुटली होती.



जेक आणि सेठ ने बिजागिरी दुरुस्त केली,

पण वाऱ्याच्या जोराने दार परत उघडले.

रॅचेल तर रडायलाच लागली.

मुलांनी एक हातोडी शोधली

आणि खिळे मारून दार बंद केले.





खिळ्यांमुळे तरी दार बंद राहील अशी साराला आशा होती.

ऍनी घाबरून तिला चिकटून बसली होती.

“सगळं काही ठीक होणार आहे,”

साराने तिच्या केसांवरून हात फिरवत

तिला धीर दिला.





थोड्याच वेळात खोलीच्या

छपराचा काही भाग उडून गेला.

आता बर्फ मुलांवर आणि

शेकोटीवर पडू लागले.

साराने मोठ्या प्रयत्नाने आपले रडू आवरले.

शाळेची मोठी पडझड झाली होती.

आता तिथे राहणे सुरक्षित नव्हते.

ते जर तिथेच राहिले,

तर बर्फात गारठून मरण्याचा धोका होता.

तिथून बाहेर पडले,

तर हिमवादळात हरवण्याचा धोका होता.

बाहेरच्या बर्फात ते गाडलेही गेले असते.

आता करायचे तरी काय?



सारालाही देखील तसेच वाटत होते.

तिने आपल्या बाईंकडे पहिले.

मिस फ्रीमननी शांतपणे

साराच्या डोळ्यात पाहिले.

साराने हळूच हसण्याचा प्रयत्न केला.

आता ती देखील

मिस फ्रीमन प्रमाणेच धीराने वागणार होती.

मिस फ्रीमन ओरडून काहीतरी सांगत होत्या.

पण घोंघावणाऱ्या वाऱ्याच्या आवाजात

काही नीट ऐकूही येत नव्हते.

मिस फ्रीमन म्हणाल्या,

“आपण माझ्या घरी जाऊया,

ते फक्त अर्ध्या मैलावर आहे.”

ॲनी रडत म्हणाली, “मला नाही जमणार,

मी गारठून गेले आहे. मला आई हवी आहे.

मला घरी जायचंय.”





मिस फ्रीमननी सगळ्या मुलांना एका ओळीत उभे केले.

एक मोठा दोर घेऊन तो सगळ्यांना बांधला.

साराने ऍनी तिच्या जवळ आहे

याची खात्री करून घेतली.

मिस फ्रीमन म्हणाल्या,

“मुलांनो, मुळीच घाबरू नका.

या दोरामुळे आपण सगळे एकत्र राहू.

मी पुढे चालेन आणि तुम्हाला रस्ता दाखवेन.”



सगळे खिडकीतून बाहेर पडले.

बाहेर गुडघ्यापर्यंत बर्फ जमला होता.

ऍनी आणि रॅचेलला मदत करण्यासाठी

जेक मागे राहिला होता.

मिस फ्रीमन ओरडून म्हणाल्या,

“अजिबात भिऊ नका. माझ्या मागोमाग या.”

हिमवादळाने साराभोवती जणू

बर्फाची सभेद भिंत उभी केली होती.

ती अंदाजाने पावले टाकत होती.

पापण्यांवर जमलेल्या बर्फाने

त्या गारठून बंद होतील असेच वाटत होते.

बर्फाने गोठलेला दोर

तिने घट्ट पकडून ठेवला होता.

“ॲनी तू ठीक आहेस ना?” तिने विचारले.

“हो, मी इथेच आहे.”

ॲनी साराच्या मागेच होती.

पण तिचा आवाज मात्र खूप लांबून आल्यासारखा  वाटत होता.







बर्फामुळे तिच्या चेहऱ्यावर हजारो सुया

बोचताहेत असे वाटत होते.

पण ती तशीच पुढे जात राहिली.

जवळ जवळ तिच्या कमरेपर्यंत बर्फ होता.

मिस फ्रीमन ओरडून म्हणाल्या,

"मुलांनो, थांबू नका.

एकेक पाऊल पुढे टाका!"

बरेच तास चालत असल्यासारखे सर्वांना वाटत होते.

गार वाऱ्यामुळे आपला श्वास अडकतो आहे

असे साराला वाटत होते.

बर्फ आणखी वाढतच होता.

खरे म्हणजे अर्धा मैल

तर केव्हाच झाला असणार.

साराचे पाय बर्फाच्या ठोकळ्या सारखे जड झाले होते.

ते एकमेकात अडकत होते.

चालता चालता ती अडखळून

बर्फात पडली.

ती खूप दमली होती.

थोडा वेळ थांबून

जराशी विश्रांती घेतली तर...

“ऊठ, उभी रहा,” कोणीतरी ओरडले.

“आता हळू जाऊन चालणार नाही.”

ती ॲनी होती.

आपल्या लहानग्या हातांनी

तिने साराला उठायला मदत केली.

मग ॲनीने तिला पुढे ढकलले.

साराच्या गालावरचे अश्रू देखील

आता गोठले होते.

पण ॲनी तिला मागे राहू देणार नव्हती.





अखेर एकदाचे ते सर्वजण

मिस फ्रीमनच्या घरी पोचले.

इतर मुलांबरोबर

सारा आणि ऍनी पण

दिवाणखान्यात पोचल्या.

मोठ्या शेकोटीने खोली चांगली उबदार झाली होती.

मिस फ्रीमन म्हणाल्या,

“मला तुम्हा सर्वांचा खूप अभिमान वाटतो.”

आणि त्यांनी प्रत्येक मुलाला कवेत घेतले,

जेक आणि सेठला देखील.

मिस फ्रीमन मुळेच आपण सर्वजण सुरक्षित आहोत

हे साराच्या लक्षात आले होते.



संध्याकाळी काही वेळाने

हिमवादळ थांबले.

एवढ्या प्रचंड बर्फातून

घरी जाण्यासाठी फार अंधार झाला होता.

मिस फ्रीमन यांच्या घरातील शेकोटी समोर

सोफ्यावर बसून सारा आणि ॲनी

आराम करत होत्या.

उबदार पांघरूण गुंडाळून

त्या गरम दूध पीत होत्या.

मग मिस फ्रीमननी सांगितले,

की उद्या सकाळी

आई-बाबांना घोडा गाडी घेऊन

त्यांना नेण्यासाठी येता  येईल.

मग त्यांना त्यांच्याबरोबर घरी जाता येईल.

ॲनी हळूच कुजबुजली,

“आईने आपल्यासाठी वाढदिवसाची केक

शिल्लक ठेवली असेल तर बरे होईल!”

साराने तिला प्रेमाने जवळ घेतले.



“ॲनी आज तू इतकी धीराने वागलीस ना,

की जर केक शिल्लक असेल,

तर ती सगळी तुझीच!”

## लेखकाचे टिप्पण

सारा आणि ऍनी या काल्पनिक मुली आहेत. परंतु, १२ जानेवारी १८८८ रोजी अमेरिकेच्या मध्य भागात एक मोठे विनाशकारी वादळ झाले होते हे मात्र खरे आहे. या धोक्याची कल्पना देण्यासाठी गवताळ प्रदेशातील कुटुंबांकडे त्यावेळी रेडिओ किंवा टेलिफोन नव्हते. नेब्रास्का मध्ये शाळेतून घरी जाताना अनेक शाळकरी मुले यात मृत्युमुखी पडली म्हणून तेथे हे वादळ 'शाळकरी मुलांचे हिमवादळ' या नावाने ओळखले जाते.

मिनी फ्रीमन यांची गोष्ट खरी आहे. मिडवेलच्या शाळेतून त्यांनी ज्यावेळी मुलांना सुरक्षित ठिकाणी नेले त्यावेळी त्या १९ वर्षांच्या होत्या. त्यांच्या धीराची आणि शौर्याची कथा त्यावेळी देशभरातील वृत्तपत्रात झळकली होती. त्यानंतर त्यांना लग्नाचे ऐंशीहून अधिक प्रस्ताव आले. त्यांच्या सन्मानार्थ एक गीत देखील लिहिण्यात आले होते.

नेब्रास्काला या 'शाळकरी मुलांच्या हिमवादळाचा' कधीच विसर पडला नाही. यातून वाचलेल्या लोकांनी एक गट स्थापन केला. या 'ब्लिझर्ड क्लबने' 'इन ऑल इट्स फ्यूरी' (वादळाची भयानकता) नावाचे एक पुस्तक प्रकाशित केले. त्यात त्यांनी अमेरिकेच्या इतिहासातील या अतिशय भयानक हिमवादळाच्या आपल्या आठवणी दिल्या आहेत.

